**<u>अध्ययन रजा मंजूर करण्याबाबत.</u>**
**श्री. मारुती महादेव खोत, सहायक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी, वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः रजामं-२०१८/(प्र.क्र.१५८/२०१८)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० ऑगस्ट, २०१८

**<u>संदर्भ-</u>** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि. ०२/०६/२००३.
२) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/२०१८/पीएचडी/६६, दि. २०/०१/२०१८
३) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/२०१८/पीएचडी/४३९, दि. ०६/०६/२०१८

**<u>शासन आदेश :</u>**

श्री.मारुती महादेव खोत, सहायक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी, वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली यांची आय. आय. टी. मुंबई येथे " visiting research fellow in Refrigeration and cryogenics Laboratory (Post-Doctoral Program)" या अभ्यासक्रमासाठी निवड झाली आहे. त्यानुषंगाने श्री. खोत यांना सदर अभ्यासक्रम पूर्ण करण्याकरीता म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील तरतूदीनुसार खालील अटींच्या अधीन राहून १२ महिन्यांची अध्ययन रजा मंजूर करण्यात येत आहे.

अ. श्री.खोत यांना संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

आ. श्री. खोत यांनी अध्ययन रजेवरून परत आल्यानंतर अध्ययन रजेच्या कालावधीत केलेल्या कामाबाबतचा संपूर्ण अहवाल तसेच उत्तीर्ण झालेल्या परीक्षांची/विशेष अभ्यासक्रमांची प्रमाणपत्रे संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनाकडे तात्काळ सादर करावीत. तसेच अभ्यासक्रमाच्या प्रभारी अधिका-याच्या अभिप्रायासह अभ्यासक्रम सुरु व समाप्त झाल्याची तारीख त्यामध्ये दर्शविण्यात यावी.

इ. श्री. खोत यांना अध्ययन रजेस जाण्यापूर्वी म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील परिशिष्ट ५ मधील नमुना-७ (श्री.खोत हे स्थायी पदावर कार्यरत असल्यास) /नमुना-९ (श्री.खोत हे अस्थायी पदावर कार्यरत असल्यास) प्रमाणे आवश्यक बंधपत्र संबंधित प्राचार्यांमार्फत संचालक, तंत्रशिक्षण यांचेकडे सादर करावे लागेल. श्री.खोत यांना कार्यमुक्त करण्यापूर्वी उपरोक्त बंधपत्र घेण्याची दक्षता संबंधित संस्था प्रमुखांनी घ्यावी.

ई. श्री. खोत यांना शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय भारताबाहेर जाता येणार नाही.

उ. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील प्रकरण-सात मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून श्री.खोत यांना अध्ययन रजा मंजूर करण्यात येत आहे. श्री. खोत यांना कार्यमुक्त करण्यापूर्वी ते महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील प्रकरण-सात मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करतात किंवा कसे याबाबत तपासणी करण्याची दक्षता संबंधित संस्थाप्रमुखांनी घ्यावी.

२. असे प्रमाणित करण्यात येते की, वरील मुदतीत श्री.खोत जर अध्ययन रजेवर गेले नसते तर त्यांनी त्यांच्या सध्याच्या सहायक प्राध्यापक या पदावर स्थानापन्न म्हणून काम केले असते.

३. शासन निर्णय,वित्त विभाग क्र.सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि. ०२ जून २००३ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २४४/१८/सेवा-६, दि.२४/०८/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८३०१३१५३९४६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2018.08.30 13:20:19 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति-:**

श्री. मारुती महादेव खोत, सहायक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी, वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली (मार्फत-संचालक, तंत्रशिक्षण)

**प्रत -**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,पुणे.
४. संचालक, वालचंद अभियांत्रिकी महाविद्यालय, सांगली.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई.
६. जिल्हा कोषागार आधिकारी,सांगली.
७. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती-तांशि-१.